महाराष्ट्र शिक्षण सेवा, गट-ब (शिक्षण सक्षमीकरण शाखा) या संवर्गातील अधिव्याख्याता या पदावरील अधिकाऱ्यांचा परिविक्षाधीन कालावधी पूर्ण करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**
**शासन निर्णय क्रमांक:-पकास-२४२५/प्र.क्र.४०/प्रशा-२**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : ०९ मे, २०२५

वाचा :- .१ शा.शि.व क्री.वि. शा.नि. क्र. ससेप्र ४४१७/प्र.क्र.२४०/ प्रशा-२, दिनांक ०२.०५.२०१८
२. सामान्य प्रशासन विभाग शा.नि.क्र. परिवी-२७१५/प्र.क्र.३०२/आठ,दिनांक २९/०२/२०१६.
३. सामान्य प्रशासन विभाग शा.नि.क्र. परिवी-२७१५/प्र.क्र.३०२/आठ,दिनांक २२/०६/२०२१
४.शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, अधिसूचना क्रमांक: एसएओ १०१/प्र.क्र.३९, प्रशा-२, दि.२६/०२/२०१८
५. शा.शि.व क्री.वि. शा.नि. क्र. विभाप-३३२३/प्र.क्र.२५०/प्रशा-२,दिनांक २०.०९.२०२३
६.आयुक्त (शिक्षण) यांचे पत्र क्र. आशिका २०२५/परिविक्षाधीन/आस्था अ १०५/००३५०, दि.२२.०१.२०२५

**प्रस्तावना :-**

उपरोक्त वाचा येथे नमूद अ.क्र. १ येथील शासन निर्णयान्वये सरळसेवेने महाराष्ट्र लोकसेवा आयोग पुरस्कृत उमेदवारांची महाराष्ट्र शिक्षण सेवा (शिक्षण सक्षमीकरण शाखा ) गट-ब संवर्गातील अधिव्याख्याता या पदावर २ वर्षाच्या परिविक्षाधीन कालावधीसाठी नियुक्ती करण्यात आली आहे. अ.क्र.४ येथील शासन निर्णयान्वये सक्षमीकरण शाखेतील अधिकाऱ्यांना विभागीय परिक्षेचे अधिनियम लागू करण्यात आलेले आहेत. विभागीय परिक्षेचे अधिनियम लागू करण्यात आल्यापासून २ वर्षाच्या संधीमध्ये उत्तीर्ण न झालेल्या अधिकाऱ्यांना अ.क्र.५ येथील शासन निर्णयान्वये श्री.विलास कडाळे यांचा परिविक्षा कालावधी वाढवून देण्यात आला आहे. सदर नियुक्ती देण्यात आलेल्या अधिकाऱ्यांच्या परिविक्षाधीन कालावधी नियमित स्वरुपात पूर्ण करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्याअनुषंगाने शासन पुढील प्रमाणे निर्णय घेत आहे.

**शासन निर्णय :-**

महाराष्ट्र लोकसेवा आयोग पुरस्कृत उमेदवारांची महाराष्ट्र शिक्षण सेवा (शिक्षण सक्षमीकरण शाखा) गट-ब संवर्गातील अधिव्याख्याता या पदावर सरळसेवेने नियुक्ती करण्यात आलेल्या अधिकाऱ्यांचा परिविक्षाधीन कालावधी पूर्ण करण्याबाबतचा प्रस्ताव आयुक्त (शिक्षण) यांनी संदर्भ क्र.६ येथील पत्रान्वये सादर केला आहे. पायाभूत शिक्षण यशस्वीरित्या पूर्ण करणाऱ्या व शासनाच्या प्रचलित धोरणानुसार परिविक्षाधीन कालावधीच्या अटींची पूर्तता करणाऱ्या खालील अधिकाऱ्यांचा त्यांच्या नावासमोर रकाना क्रमांक ७ मध्ये नमूद दिनांकास परिविक्षाधीन कालावधी पूर्ण करण्यात येत असून, रकाना क्रमांक ८ मध्ये नमूद दिनांकास त्यांची सेवा पुढे चालू ठेवण्यास शासन मंजूरी प्रदान करण्यात येत आहे.

| अ क्र | अधिकाऱ्यांचे नांव | शासन सेवेत नियुक्तीच्या आदेशाचा दिनांक | शासन सेवेत प्रथम रुजू झाल्याचा दिनांक | रकाना ४ मधील दिनांकानुसार परिविक्षाधीन कालावधी पूर्ण होण्याचा दिनांक | परिविक्षा कालावधीत घेतलेल्या एकूण अर्जित/परिवर्तीत रजा इ. एकूण कालावधी | रकाना ६ मधील कारणांमुळे वाढलेला परिविक्षाधीन कालावधी पूर्ण होण्याचा दिनांक | परिविक्षाधीन कालावधी समाधानकारक पूर्ण केल्यामुळे शासन सेवा ज्या दिनांकापासून पुढे चालु ठेवावयाची आहे तो दिनांक |
|---|---|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ | ८ |
| १ | श्री.गजेंद्र जमादार | २७.०५.२०१३ | १९.१२.२०१३ | १९.१०.२०२३ | १४ दिवस | ०५.११.२०२३ | ०६.११.२०२३ |
| २ | श्री.विलास प्रकाश कडाळे | ०२.०५.२०१८ | ०३.०५.२०१८ | १९.१०.२०२३ | निरंक | २३.१०.२०२३ | २४.१०.२०२३ |

२. शिस्तभंग विषयक किंवा फौजदारी किंवा विभागीय चौकशी किंवा न्यायालयीन कारवाईवर परिवीक्षाधीन कालावधी संपविण्याच्या आदेशाचा परिणाम होणार नाही.

३. परिविक्षाधीन कालावधी समाधानकारकरित्या पूर्ण केला असल्याबाबतची नोंद त्यांच्या सेवापुस्तकात घेण्यात यावी तसेच त्यांना वार्षिक वेतनवाढी देण्यात याव्यात.

४. परिवीक्षा कालावधी समाधानकारकरित्या पूर्ण करण्याबाबत प्रशासकीय विभागाच्या सचिवांना सक्षम प्राधिकारी म्हणून दि.२२.०६.२०२१ रोजीच्या घोषित करण्यात आले आहेत. त्यास अनुसरुन सदर शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक क्रमांक २०२५०५०९१३१५१७००५९२१ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

DNYANESHWAR ASARAJI AVHAD

Digitally signed by DNYANESHWAR ASARAJI AVHAD
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SCHOOL EDUCATION AND SPORTS DEPARTMENT, 2.5.4.20=190ce31a764c50caee9a11b81ac560fc0d85bb0ebc377f46c4fc0040aae47135, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=05AE42076719D0FCE5DC8ACF3A44FBA50819DD0D088B25A2D0D7CDE0256A48B0, cn=DNYANESHWAR ASARAJI AVHAD
Date: 2025.05.09 13:16:44 +05'30'

**( ज्ञानेश्वर आव्हाड )**
**कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) आयुक्त (शिक्षण), महाराष्ट्र राज्य, पुणे
२) सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई (पत्राद्वारे)
३) सर्व शिक्षण संचालक
४) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर
५) प्राचार्य, सर्व जिल्हा शिक्षण व प्रशिक्षण संस्था
६) संबंधित जिल्हा कोषागार अधिकारी
७) संबंधित अधिकारी ( आयुक्त शिक्षण यांचे कार्यालया मार्फत)
८) निवडनस्ती